मे. पॅरामिन ॲडव्हर्टायझिंग ॲन्ड मार्केटिंग असोसिएटस, मुंबई यांनी तयार केलेल्या दुरचित्रवाणी वरील जाहिरातीचे देयक अदा करणे बाबत..

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांकः-एमएलए-१०१५/प्र.क्र. १९१/७-स,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ३१ मार्च, २०१७

**वाचा:-** १) शासन निर्णय सा.प्र.वि. क्र.मावज-२०१३/प्र.क्र.४२३/३४, दि.२४ डिसेंबर, २०१३.
२) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र. पुनर्वि २०१७/प्र.क्र.३७/१७/१७-स, दि.३१.३.२०१७

**प्रस्तावना:-**

राज्यातील जास्तीत जास्त शेतकऱ्यांना व सर्वसामान्य लोकांना महाराष्ट्र सावकारी (नियमन) अधिनियम, २०१४ व इतर योजनांची माहिती उपलब्ध होण्यासाठी व्यापक प्रसिध्दी मोहीम राबविणे आवश्यक असल्याने शासन मान्यताप्राप्त निर्माता यादीमधील मे. पॅरामिन ॲडव्हर्टायझिंग ॲन्ड मार्केटिंग असोसिएटस, फोर्टमुंबई , या एजन्सी मार्फत सावकारी अधिनियम तसेच ई-गव्हर्नसची चित्रफित तयार करण्यात आली. सदर जाहिरातीची चित्रफित दि. १४ ऑगस्ट २०१४ ते दि. २५ ऑगस्ट २०१४ या कालावधीत IBN Lokmat, Z२४ Taas व ABP Maza या वाहिन्यांवर विहित वेळेत प्रसारीत करण्यात आली. सदर जाहीरातीचे देयक केंद्र शासनाच्या DAVP या यंत्रणेने निश्चित केलेल्या दरानुसार असून सदर दराच्या १ % कमी दराने देयक अदा करण्याचे प्रस्तावीत करण्यात आलेले आहे. तसेच दि.१२.०१.२०१७ च्या पत्रानुसार सदर संस्थेने चित्रफित तयार करण्याच्या देयकात रू.७०,०००/- एवढया रकमेची सुट देण्याचे मान्य केले आहे. त्यानुसार सदर चित्रफित तयार करणे व प्रसारित करणे यासाठी एकूण रु. ४६,७८,२९२/- एवढा खर्च आला असून त्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

०१. मे. पॅरामिन ॲडव्हर्टायझिंग ॲन्ड मार्केटिंग असोसिएटस, मुंबई यांचे मार्फत सावकारी अधिनियमाची तसेच ई-गव्हर्नसची चित्रफित तयार करून सदर चित्रफित दि.१४ ऑगस्ट २०१४ ते २५ ऑगस्ट २०१४ या कालावधीत IBN Lokmat, Z२४ Taas व ABP Maza या वाहिन्यांवर विहित वेळेत प्रसारीत करण्यात आली. सदर चित्रफित तयार करणे व प्रसारित करणे यासाठी आलेल्या एकूण रु. ४६,७८,२९२/- (रुपये सेहेचाळीस लाख, अठ्ठयाहत्तर हजार, दोनशे ब्याण्णव फक्त) इतक्या खर्चाचे देयक अदा करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. या प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्र. व्ही-२, ३४५१-सचिवालयीन अर्थिक सेवा (००) (०९०) - सेक्रेटरिएट (०१) (०१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (दत्तमत) (३४५१ ०३०४) १३ कार्यालयीन खर्च (योजनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

०३. या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या रु. ४६,७८,२९२/- (रुपये सेहेचाळीस लाख, अठ्ठयाहत्तर हजार, दोनशे ब्याण्णव फक्त) चा धनादेश “PARAMIN ADVERTISING AND MARKETING ASSOCIATES” यांच्या नांवे काढण्यात यावा. तसेच धनादेश मिळाल्याची पोचपावती घेण्यात यावी.

०४. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात वितरीत केलेला निधी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून तातडीने वितरीत करण्यात यावा :-

अ) ज्या उद्देशासाठी निधी मंजूर आहे त्या व्यतिरिक्त इतर उद्देशासाठी खर्च करता येणार नाही. तसेच निधी इतर लेखाशिर्षाखाली वळती करता येणार नाही.

०५. सदर निधी वितरीत करण्यासाठी श्री. र. गं. बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच डॉ. सुदिन गायकवाड, उप सचिव (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक:- १९१/१७/व्यय २,दि.२९.०३.२०१७ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०३३१२०४७०८९१०२ असा आहे, हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d232bb3a3fcc8, cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2017.04.01 11:51:07 +05'30'

**( र.ज.कदम )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षण ), महाराष्ट्र -१, मुंबई
२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,(मुळ देयकासह)
३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
४. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
५. कार्यासन अधिकारी (१६-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
६. कार्यासन अधिकारी (२-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, मे. पॅरामिन ॲडव्हर्टायझिंग ॲन्ड मार्केटिंग असोसिएटस, मुंबई, ४अ बोटावाला चेंबर्स, पहिला मजला, पी. एम. रोड, फोर्ट मुंबई १.
८. निवड नस्ती